वाय टू के (Y2K) समस्या निवारणासाठी
जनजागरण मोहीम राबविण्याबाबत.......

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
शासन निर्णय क्र. सीओएम-१०९८/प्र.क्र. १०९/९८/३९,
मंत्रालय, मुंबई - ३२.
दिनांक :- १८ नोव्हेंबर, १९९९.

वाचा :- शासन परिपत्रक समक्रमांक, दिनांक १० मे, १९९९

**शासन निर्णय :-**

शासकीय कामकाजाचे संपूर्णतः संगणकीकरण करण्याच्या धोरणात्मक निर्णयाची अंमलबजावणी विविध शासकीय विभाग / कार्यालयांमधून प्रगतीत आहे. शासकीय कामकाजात संगणकाचा वापर सुरु झालेला असून वापरात असलेल्या कार्यप्रणाली आज्ञावल्या व संगणक संयंत्रे वाय टू के (Y2K) कंम्प्लायंट असल्याबाबतची तपासणी बहुतांशी विभागांकडून / कार्यालयांकडून प्रगतीत आहे. शासनांकडून तसेच विविध संस्थांकडून सार्वजनिक क्षेत्रांशी निगडीत सेवा पुरविणाऱ्या उपक्रमांमध्येही वाय टू के (Y2K) संगणक समस्या निराकरणांवर भर देण्यांत येत आहे.

केंद्र शासन व इतर संस्थांकडून वाय टू के (Y2K) संदर्भात करण्यांत येत असलेल्या प्रसिध्दीच्या प्रयत्नांस राज्य शासनांकडून सुध्दा जोड देण्याची गरज आहे. निरनिराळ्या औद्योगिक संस्था आणि सार्वजनिक क्षेत्रांशी निगडीत सेवा पुरविण्याऱ्या उपक्रमांशिवाय वाय टू के (Y2K) संदर्भात जनतेस त्यांच्याकडून आवश्यक असलेल्या प्रयत्नांची माहिती देण्याची गरज आहे. कारण जनतेस सुध्दा याबाबतीत एक महत्वाची आणि जागरुकतेची भूमिका पार पाडावयाची आहे. त्याचप्रमाणे विविध उपक्रमांशी संबधित असलेल्या जनतेच्या बऱ्याच सेवांचा याचेशी घनिष्ट संबंध आहे. उदा. वैद्यकीय रुग्णालयातील विविध उपकरणे इ.. वाय टू के (Y2K) समस्या उद्‌भवल्यास त्याचा सर्वसामान्य जीवनावर प्रतिकूल परिणाम होऊ नये यांसाठी वाय टू के (Y2K) समस्या निराकरणासंदर्भात शासन तसेच विविध संस्थांकडून करण्यांत येत असलेल्या प्रयत्नांबरोबरच विविध प्रसिध्दी माध्यमाद्वारे जनजागरण करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

त्या अनुषंगाने सर्वसामान्य नागरिकांना वाय टू के (Y2K) समस्येबाबतची तसेच करावयाच्या उपाययोजनेबाबतची मुलभूत माहिती अवगत व्हावी यासाठी प्रभावी प्रसिध्दी माध्यमाद्वारे जनजागरण मोहीम राबविण्यासाठी विविध क्षेत्रांमधील जनजागरण मोहीम राबविण्यासाठी विविध क्षेत्रांमधील तज्ञ व्यक्तींचा समावेश असलेली एक समिती स्थापन करण्याचाही निर्णय शासनाने घेतला आहे. सदरहू समितीमध्ये पुढील सदस्यांचा अंतर्भाव राहील.

१) महासंचालक, माहिती व जनसंपर्क - अध्यक्ष.
२) तांत्रिक संचालक, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र (पश्चिम विभाग) - सदस्य.
३) संचालक, दूरदर्शन मुंबई - सदस्य.
४) संचालक, ऑल इंडिया रेडीओ, मुंबई - सदस्य.
५) संचालक, आरोग्य सेवा - सदस्य.
६) संचालक, वैद्यकीय शिक्षण - सदस्य.
७) अधिक्षक अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग - सदस्य.
८) संचालक, औद्योगिक सुरक्षा - सदस्य.
९) निरिक्षक, बाष्पके - सदस्य.
१०) संचालक, शासकीय मुद्रणालय - सदस्य.
११) संचालक, माहिती तंत्रज्ञान - सदस्य सचिव.

वरील समितीची कार्यकक्षा ही, सर्वसामान्य नागरिकांना वाय टू के (Y2K) समस्येबाबतची तसेच करावयाच्या उपाययोजनेबाबतची मूलभूत माहिती अवगत करुन देण्याच्या दृष्टीने विविध प्रसिध्दी माध्यमांद्वारे परिणामकारकरित्या जनजागरण करणे, अशी राहील.

महासंचालक, माहिती व जनसंपर्क यांना उपरोक्त गठीत समितीमध्ये तज्ञ व्यक्तींना स्वीकृत सदस्य म्हणून नियुक्त करण्याबाबतचे प्राधिकार राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(विरेंद्र जाधवराव)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
नियडनस्ती (का. ३९)

---

एच-878(4000-12-99)।अ. GR-2002 0422120005000-4104